सन २०१४-१५ च्या टंचाई कालावधीसाठी
कामठी शहरातील पाणी टंचाई निवारणार्थ
नगर परीषद कामठी, जिल्हा नागपूर येथे ३०
विंधनविहीरींच्या कामास पाणी पुरवठा
योजनेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१५/प्र.क्र. १०७ /पापु १४**
जी. टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ११ जून, २०१५

**वाचा -**

१) शासन निर्णय पा.पु. व स्व. वि. क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र. १४९/पापु १४, दिनांक २१.८.२००९
२) शासन पत्र क्रमांक टंचाई २०१४/प्र.क्र. ८४/पापु १४, दिनांक १०.०६.२०१५ (बैठकीचे इतिवृत्त)
३) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे क्रमांक एमयुएन १९(१)/सिआर-६३/२०१५, दिनांक १६.०५.२०१५ चे पत्र व प्रस्ताव
४) जिल्हाधिकारी, नागपूर यांच्या क्रमांक कक्ष १२/एमयुएन ५/कावि२७५/२०१५, दिनांक २९.०४.२०१५ चे पत्र व प्रस्ताव

**प्रस्तावना -**

विभागीय आयुक्त, नागपूर यांनी सन २०१४-१५ च्या टंचाई कालावधीसाठी कामठी शहर तातडीची पाणी पुरवठा योजनेंतर्गत नगर परीषद कामठी, जिल्हा नागपूर येथे ३० विंधनविहीरींच्या कामास प्रशासकीय मंजूरी मिळण्याबाबत योजनेचा रु. २७.९० लक्ष किंमतीचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्ताव सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दिनांक ६.०६.२०१५ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला होता.

विभागीय आयुक्त नागपूर यांच्याकडून प्राप्त कामठी शहर पाणी पुरवठा योजनेत नगरपरीषद कामठी, जिल्हा नागपूर येथे प्रत्येकी रुपये ९३,०२८/- याप्रमाणे ३० विंधनविहीरींचा रुपये २७.९० लक्ष रक्कमेचा प्रस्ताव प्राप्त झालेला होता. सदर प्रस्तावावर दि. ६.०६.२०१५ रोजीच्या स्थायी समितीच्या

बैठकीत सविस्तर चर्चा होऊन स्थायी समितीने प्रस्तावास मंजूरी दिली. त्या अनुषंगाने सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

विभागीय आयुक्त, नागपूर यांनी कामठी शहराच्या पाणी टंचाई निवारणार्थ कामठी, जिल्हा नागपूर येथे प्रत्येकी रुपये ९३,०२८/- याप्रमाणे ३० विंधनविहीरींचा रुपये २७.९० लक्ष रक्कमेचा प्रस्ताव संदर्भ क्र. ३ च्या पत्रासोबत शासनास सादर केलेला आहे. सदर प्रस्तावात प्रस्तावनेत नमूद केलेल्या कामांचा समावेश असलेल्या रु. २७.९० लक्ष (रुपये सत्तावीस लक्ष नव्वद हजार फक्त) किंमतीच्या प्रस्तावास स्थायी समितीने दिनांक ६.०६.२०१५ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यामुळे या आदेशान्वये सदर प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी, नागपूर यांनी कामठी शहरात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्व प्रथम घोषित करणे.
२) सदर योजनेची देखभाल दुरुस्ती व योजनेचे व्यवस्थापन नगर परिषद, कामठी यांनी करणे आवश्यक राहील. तसेच योजनेची अंमलबजावणी नगर परिषद, कामठी यांच्यामार्फत करण्यात यावी.
३) सदर योजनेचे काम १ महिन्याच्या आत तातडीने पूर्ण करावे.
४) सदर योजनेच्या एकूण रुपये २७.९० लक्ष खर्चाच्या ९०% म्हणजेच रुपये २५.११लक्ष इतके अनुदान शासनाद्वारे उपलब्ध करुन दिले जाईल. उर्वरीत रक्कम म्हणजेच योजनेच्या १०% रक्कम रुपये २.७९ लक्ष रक्कम नगर पंचायत, कामठी यांनी भरावयाची आहे. तसेच अशा आशयाचा ठराव नगर पंचायतीने पारित करणे आवश्यक राहील.
५) विभागीय आयुक्त, नागपूर यांनी सदर योजनेकरिता योजनेच्या सुरुवातीस ५०% इतका निधी द्यावा. उर्वरित ५०% निधी योजना कार्यान्वित झाल्यानंतर देण्यात यावा.

२. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) पिण्याच्या पाण्याच्या आकस्मिक निकडीच्या पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर) - ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी सचिवस्तरीय स्थायी समिती स्थापन केली असून सदर

समितीच्या दिनांक ६/६/२०१५ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१११५२९३९११२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.06.11 16:57:33 +05'30'

**(म. भ. सावंत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा व परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा व परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७. विभागीय आयुक्त, नागपूर
८. जिल्हाधिकारी, नागपूर
९. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण नागरी व ग्रामीण विभाग,नागपूर
१०. मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
११.उप सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१२.पापु १४ (निवडनस्ती)